**राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांच्या १५० व्या जयंती निमित्त महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्यामार्फत सन २०१८-१९, २०१९-२० व २०२०-२१ या तीन आर्थिक वर्षात आयोजित करण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांसाठी येणाऱ्या आराखड्यास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०१८/प्र.क्र.१३६/उद्योग-६.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १५ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> :१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८५/पंरा-१,दि.१६ एप्रिल, २०१८.

२) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ मुंबई , यांचे दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१८ चे पत्र

**प्रस्तावना:-**

राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांच्या १५० व्या जयंती समारंभ सन २०१९ मध्ये होणार आहे. राष्ट्रपिता महात्मा गांधीजींनी दिलेली शिकवण व आचरणात आणलेली मुल्ये आपल्या कृतीतून पुढे घेऊन जाण्याकरीता तसेच महात्मा गांधीजी यांचा संदेश जगभरातील पुढील पिढ्यांपर्यंत जिवंत ठेवणे आवश्यक असल्याने सन २०१८ या वर्षापासून विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यासंदर्भात केंद्र शासनाच्या स्तरावर एक समिती गठीत करण्यात आली असून मा. मुख्यमंत्री , महाराष्ट्र राज्य हे या समितीचे सदस्य आहे. महात्मा गांधीजींचे कार्य व त्यांच्या विचारधारेच्या अनुषंगाने महाराष्ट्र शासनामार्फत या वर्षामध्ये राबविण्यात येणा-या योजनांचा आराखडा तयार करून त्यांची अंमलबजावणी करण्याकरीता ग्राम विकास विभागाच्या शासन निर्णय दिनांक १६.०४.२०१८ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली एक उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात आली आहे.

उपरोक्त अनुषंगाने महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्यामार्फत २०१८-१९, २०१९-२० व २०२०-२१ या तीन आर्थिक वर्षात आयोजित करण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांचा आराखडा शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आलेला आहे.तदनुषंगाने अतिरिक्त नियतव्यय उपलब्ध करुन देण्याची नियोजन विभागास विनंती करण्यात आली होती. नियोजन विभागाने खर्चाच्या मागणीसाठी पुरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्याचे सूचित केले. त्यानुसार २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी रुपये ७.१५ कोटी इतका रकमेचा पुरक मागणीचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास सादर करण्याची कार्यवाही स्वतंत्र नस्तीवर करण्यात येत आहे.सन २०१८-१९, २०१९-२० व २०२०-२१ या तीन वित्तीय वर्षात आयोजित करण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांचा आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाने त्यांच्या संदर्भाधिन दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या आराखड्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. आराखड्याचा तपशील सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांखाली त्या-त्या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१०१५१६५२०९७२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajiv Madhav Ambikar

Digitally signed by Rajiv Madhav Ambikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4afb47d807935092599a3e28024dd3d3c461bada30a950e81e666a02aad578f5, cn=Rajiv Madhav Ambikar
Date: 2018.10.15 16:54:54 +05'30'

**( राजीव आंबीकर)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई-३२.
३. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१०. विकास आयुक्त ( उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई- ०१
१२. निवड नस्ती (उद्योग-६).